# ईसापच्या नीतिकथा



# ईसापच्या नीतिकथा

ईसापच्या नीतिकथा अडीच हजार वर्षांपूर्वी लिहिल्या गेल्या. तेव्हापासून अनेक वेगवेगळ्या रुपांत या कथा आपल्यासमोर आलेल्या आहेत. सॉक्रेटीसने स्वत: यांतील काही कथांवर कविता रचल्या. आजसुद्धा चित्रकार या कथांना नवनव्या चित्रांनी सजवत असतात.



# सिंहाचे कातडे पांघरलेले गाढव



एका गाढवाला कुठुनसे सिंहाचे कातडे सापडले. त्यान ते अंगावर पांघरले. मग गाढव लोकांना घाबरवत फिरू लागले.

त्याला बघून सगळे भीतीने पळू लागले. त्यांना वाटले की तो सिंहच आहे.



काही काळाने गाढव स्वत:ला सिंहच समजू लागले. त्याने गर्जना करण्यासाठी तोंड उघडले.



पण त्याच्या तोंडून फक्त रेकणेच निघाले.

HEE HAW!

“अच्छा! तू गाढव आहेस तर! कोल्हा म्हणाला. “तू मला मूर्ख बनवत होतास! बरं झालं तू आपलं तोंड उघडलंस.“

लोकांकडून आदर मिळण्यासाठी कधीकधी आपले तोंड बंद ठेवणे हिताचे असते.

# स्नान करणारा मुलगा



एक मुलगा नदीत स्नान करत होता. अचानक तो खोल पाण्यात गेला आणि बुडू लागला.

त्या मुलाने मदतीसाठी मारलेल्या हाका एका माणसाने ऐकल्या. तो माणूस नदीकाठावर आला आणि निष्काळजीपणाबद्दल मुलाची खरडपट्टी काढू लागला. “अहो, मला आधी वाचवा. मग काय ती माझी खरडपट्टी काढा,” मुलगा बोलला.



संकटात मदत करा, सल्ला देऊ नका.

# कुत्रा आणि त्याचे प्रतिबिंब



एका कुत्र्याला त्याच्या आवडीचे हाडुक मिळाले. तो ते घरी नेऊ लागला.

पूलावरून जात असताना कुत्र्याला पाण्यात आपले प्रतिबिंब दिसले.

कुत्र्याला वाटले, पाण्यातल्या कुत्र्याकडे आपल्यापेक्षा मोठे हाडुक आहे.



त्याने पाण्यातल्या कुत्र्याकडे असलेल्या हाडकावर झडप घातली. पण यादरम्यान त्याच्या स्वत:च्या हातात असलेले हाडुक पाण्यात पडले.

आता कुत्र्याकडे एकही हाडुक नव्हते. कारण पाण्यातील हाडुक म्हणजे फक्त प्रतिबिंब होते व हातातील खरे हाडुक पाण्यात बुडाले.

प्रतिबिंबाला पकडण्याचा प्रयत्न कराल तर खरी वस्तू गमवाल.

# कोल्हा आणि कावळा



एक कावळा झाडाच्या फांदीवर बसला होता. त्याच्या चोचीमध्ये चीजचा तुकडा होता.

झाडाखाली असलेल्या कोल्ह्याला चीजचा तुकडा हवा होता. त्यासाठी त्याने एक युक्ती केली.

“अहाहा! किती सुंदर आहे हा पक्षी!” कावळ्याला ऐकू जाईल एवढ्या मोठ्या आवाजात कोल्हा म्हणाला, “या सुंदर पक्ष्याचा आवाजसुद्धा किती सुरेख असेल. मला त्याचं गाणं ऐकायला मिळालं तर काय बहार येईल!”




मूर्ख कावळ्याने गाणे म्हणण्यासाठी तोंड उघडले. पण त्याच्या तोंडून बाहेर आले, “काव!” आणि चीजचा तुकडा!



कोल्ह्याने चीज खातखात म्हटले, “कावळे महाशय, तुमच्याकडे आवाज तर आहे पण बुद्धी नाही.”

खुशामतीला भुलू नका.

# कोल्हा आणि द्राक्षे

एका भुकेल्या कोल्ह्याला वेलीवर लटकणारा रसाळ द्राक्षांचा घड दिसला.







त्याने द्राक्षे तोडण्याचा खूप प्रयत्न केला. पण द्राक्षे त्याच्या हाताला लागली नाहीत.




शेवटी कोल्ह्याला द्राक्षे खाण्याची इच्छा सोडून द्यावी लागली.





आपली निराशा लपवण्यासाठी कोल्हा म्हणाला, “ही द्राक्षे आंबट दिसतायत. मला नकोत ती.”



आपल्याला हवे ते मिळाले नाही की त्याची इच्छा नाही, असे दाखवणे.

# डास आणि बैल

एक डास एका बैलाच्या शिंगावर जाऊन बसला. तिथे त्याने बराच वेळ आराम केला.



शेवटी डास पुन्हा उडून जाण्यासाठी सज्ज झाला. तो बैलाला म्हणाला, “माफ कर. मला आता जायला हवं.”

“मग जा की,” बैल म्हणाला, “तू आलास तेव्हा मला काही कळलं नाही. तू गेलास तरी मला तुझी उणीव भासणार नाही.”



आपण कधीकधी स्वत:ला इतरांच्या तुलनेत उगाचच जास्त महत्त्व देतो.

# हंस आणि सोन्याचे अंडे



एक मनुष्य आणि त्याची पत्नी खूप भाग्यवान होते. त्यांच्याकडे सोन्याचे अंडे देणारी एक हंसीण होती.

पण या दांपत्याला खूप झटपट श्रीमंत व्हायचे होते. हंसीण दिवसाला फक्त एकच अंडे देते, हे त्यांना पुरेसे वाटत नव्हते.





त्यांना वाटले की हंसीणीच्या पोटात सोन्याची खूप अंडी असतील. मग त्यांनी हंसीणीला मारून तिच्या पोटातील सगळी अंडी एकदम मिळवायचे ठरवले. पण हंसीणीचे पोट फाडल्यावर त्यांना अंडी मिळाली नाहीत. ही हंसीण इतर सामान्य हंसीणीसारखीच निघाली.

रात्रीच्या जेवणात त्यांनी ती हंसीण भाजून खाल्ली. आपल्या हव्यासापोटी त्यांनी सगळे काही गमावले.




आहे त्यात समाधान माना.

# गवळण आणि तिची बादली

गवळण आपल्या डोक्यावर दुधाची बादली घेऊन जात होती. या दुधाचे कायकाय करायचे, याची ती दिवास्वप्ने पाहू लागली.

“मी हे दूध घुसळून लोणी काढेन. लोणी विकून काही अंडी विकत घेईन,” ती म्हणू लागली.





“लवकरच ती अंडी
आम्हाला खूप कोंब
मिळ

असे म्हणून तिने आपली मान जोरात हलवली.





“मी कोंबड्या विकून
छानसे कपडे विकत घेईन.
सगळी मुले माझे सुंदर
कपडे बघून माझ्यासोबत
नाच करायला पुढे येतील.
पण मी त्यांना नकार
देईन आणि माझी मान
अशी हलवेन.”



कोंबड्या अंड्यातून बाहेर
येण्याआधीच त्यांचे काय करायचे हे
ठरवू नका.

# बैल आणि बेडूक



काही बेडकांनी एका बैलाला पाहिले. "तो किती मोठा आहे!" एक म्हणाला.

"मी प्रयत्न केला तर त्याच्यापेक्षाही मोठा होऊ शकतो," दुसरा दीर्घ श्वास घेत म्हणाला, "बघ, मी बैलापेक्षा मोठा दिसतो की नाही?"



"अजिबात नाही," त्याचा मित्र म्हणाला. बढाया मारणाऱ्या बेडकाने आणखी खोल व दीर्घ श्वास घेतला.



"बैल याच्यापेक्षाही मोठा होता," त्याचा मित्र म्हणाला.

मग बढाईखोर
बेडूक श्वास
आतमध्ये ओढून
ओढून मोठा होत
गेला.

हे ऐकताच बेडकाने
एक प्रदीर्घ श्वास आत
घेतला. पण तो फुटला.





"बैल यापेक्षाही मोठा होता,"
त्याचा मित्र पुन्हा म्हणाला.

बढाया मारणाऱ्या लोकांचे पितळ
आज किंवा उद्या उघडे पडते.

# मेंढपाळ मुलगा आणि लांडगा

एकदा एका मेंढपाळ मुलाने जवळच्या गावातील लोकांची चेष्टा करण्याचे ठरवले. तो मोठमोठ्याने ओरडू लागला:




मेंढ्यांना लांडग्यापासून वाचवण्यासाठी लोक धावतपळत आले. पण त्यांना तिथे लांडगा दिसलाच नाही.

लोक कसे मूर्ख बनले, असे समजून मेंढपाळ मुलाला मजा वाटली. मग त्याने हीच चेष्टा त्यानंतर अनेकदा केली.



मग एक दिवस लांडगा खरंच आला. मेंढपाळ मुलगा शक्य तितक्या मोठ्या आवाजात ओरडू लागला, “लांडगा! लांडगा!” पण लोक या आवाजाला एवढे सरावले होते की कोणीही त्याकडे लक्ष दिले नाही.

लांडग्याने मेंढ्यांचे तेच केले जे तो नेहमी करतो.



थापाड्याने सत्य सांगितले तरी कुणी त्याच्यावर विश्वास ठेवत नाही.

# शहरी उंदीर आणि ग्रामीण उंदीर

एक शहरी उंदीर गावात राहाणाऱ्या उंदराकडे गेला. गावातील उंदराची जीवनशैली अगदी साधी होती. “तू फक्त हेच अन्न खातोस?” शहरी उंदराने विचारले, “मी शहरात राजासारखा राहातो. तू माझ्याकडे येऊन का राहात नाहीस?”



म्हणून मग शहरी उंदीर शहरात परतला तेव्हा गावातील उंदीरही त्याच्यासोबत गेला. गावातील उंदराने त्याच्या संपूर्ण आयुष्यात असे मिष्ठान्न पाहिले नव्हते.

पण दर वेळी अन्नाला तोंड लावताच कुणीतरी तिथे येत असे. त्यामुळे उंदरांना तिथून धूम ठोकावी लागत असे.

“मी गावात परततो,” गावातील उंदीर म्हणाला, “गावात भले मिष्टान्न नसेल, पण मी शांतपणे खाऊ तरी शकतो.”




समाधानात खायला मिळणारी भाकर अस्वस्थतेत खायला मिळणाऱ्या मिष्टान्नापेक्षा बरी.

# लांडगा आणि हंस



एका लांडग्याच्या गळ्यात एक हाडुक अडकले. त्याने हाडुक बाहेर काढण्यासाठी हंसाला बक्षीस देण्याचे वचन दिले.

हंसाने आपली मान लांडग्याच्या तोंडात सरकवली आणि आपल्या लांबलचक चोचीने हाडुक सहजपणे बाहेर काढले.



पण हंसाने बक्षीस मागताच लांडग्याने दात विचकत म्हटले:

“तू तुझी मान एका लांडग्याच्या तोंडात घातलीस आणि तरीही तू जिवंत राहिलास. यापेक्षा मोठे बक्षीस काय असू शकते?”





दुष्टांशी व्यवहार करताना आपले डोके सलामत राहिले तर बेहतर!

# मेंढीच्या वेषात लांडगा



एका लांडग्याने मेंढीचे कातडे अंगावर घातले. यामुळे मेंढ्यांच्या कळपात सहजपणे शिरून तो मेंढ्यांची शिकार करू शकणार होता.

मेंढ्या गवताळ कुरणात चरत होत्या तेव्हा लांडगा त्यांच्यात मिसळला.



मेंढीच्या वेषातील लांडग्याने मेंढपाळाला चांगलेच चकवले.

संध्याकाळी मेंढपाळाने सर्व मेंढ्यांसोबत लांडग्यालाही कुंपणात बंद केले.

"आज रात्री मला चांगलं पोटभर जेवण मिळेल," लांडगा स्वत:शीच म्हणाला. तेवढ्यात पुढच्या दिवशी मांस पाहिजे, म्हणून मेंढपाळ तिथे आला.

मेंढपाळाने चुकून लांडग्याला मेंढी समजून जागेवरच कापले.



संकटाचा शोध घेऊ नका. दुसऱ्या कुणाचेतरी संकट तुमच्या वाट्याला येईल.

**समाप्त**